कोषागारातून रोख देय अनुदान
२२१५,पाणी पुरवठा व स्वच्छता अनुसूचित
जाती उपयोजना लेखाशीर्ष (२२१५ १३२४)
अंतर्गत निधी वितरण

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः ग्रापापु-२०१४/प्र.क्र.३३/पापु-१०**
जी.टी. रूग्णालय संकुल, ७ वा मजला,
टिळक रोड, मंत्रालय, मुंबई-०१
तारीख: २६ मार्च, २०१५

वाचा

१) **सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग यांचे पत्र क्रमांकः विघयो २०१३/प्र.क्र.७१/विघयो, दि.१३.२.२०१४.**
२) **वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांकः अंदाज-२०१३ /प्र.क्र-८५ /अर्थ-३ दि. २.१.२०१५**
३) **वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांकः अंदाज-२०१३ /प्र.क्र-८५ /अर्थ-३ दि. ९.२.२०१५**
४) **शासन निर्णय क्रमांकः ग्रापापु-२०१४/प्र.क्र.३३/पापु-१०.दि.१२.११.२०१४**
५) **शासन निर्णय क्रमांकः ग्रापापु-२०१४/प्र.क्र.३३/पापु-१०.दि.७.१.२०१५**

प्रस्तावना

मागणी क्र. Y-०२ ,लेखाशीर्ष २२१५,पाणी पुरवठा व स्वच्छता, १०२ ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम, ०२ जिल्हा परिषदांना योजनांतर्गत अनुदाने, अनुसूचित जाती उपयोजना (०२)(१३) नळाद्वारे पाणीपुरवठा योजना(स्थानिक स्तर), ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) (२२१५ १३२४) या लेखाशीर्षाखाली वर्धा जिल्हा परिषदेस मागणीनुसार निधी वितरणाचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता

**शासन निर्णय**

मागणी क्र. Y-०२ ,लेखाशीर्ष २२१५,पाणी पूरवठा व स्वच्छता, १०२ ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम, ०२ जिल्हा परिषदांना योजनांतर्गत अनुदाने, अनुसूचित जाती उपयोजना (०२)(१३) नळाद्वारे पाणीपुरवठा योजना(स्थानिक स्तर),३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) (२२१५ १३२४) याखाली जिल्हा परिषद वर्धा यांना त्यांचे मुख्य कार्यकारी अधिकारी यांचेमार्फत योजनांसाठी रु. ४४.२ लक्ष व देखभाल दुरुस्तीसाठी रु. ७.८ लक्ष या प्रमाणे एकूण रु.५२.०० लक्ष (रु. बाबन्न लक्ष फक्त ) इतकी रक्कम यासोबतच्या विवरणपत्रानूसार अर्थसंकल्प प्रणालीद्वारे पुढील अटी व शर्तींच्या अधीन राहून रोख मंजूर व मुक्त करण्यात येत आहे.

अ) जिल्हा परिषदेने हे अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहे त्या विनिर्दिष्ट प्रयोजनासाठीच खर्च करावे.
आ) जिल्हा परिषदेने या अनुदानातून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवावेत.
इ) वरील अटी/ शर्तींची जिल्हा परिषदेकडुन पूर्तता होत आहे, हयाची शासनाला खात्री करुन घेता यावी म्हणून महालेखापाल महाराष्ट १/२, मुंबई/नागपूर यांना तसेच या विभागातील प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्यास लेखा परिक्षणाकरिता जिल्हा परिषदांची पुस्तके व लेखे पाहण्याचा अधिकार राहील, महालेखापाल यांना त्यांचे काम योग्य तऱ्हेने पार पाडता यावे म्हणून जिल्हा परिषदा संपूर्ण मदत व सुविधा पुरवतील.
ई) शासन परिपत्रक ग्राम विकास विभाग क्र. आरसीएन १०८९/सीआर ३०२७/२८, दिनांक ५.९.१९९० मधील सूचनेप्रमाणे या अनुदानाच्या खर्चाचा महालेखापाल कार्यालयात नोंदविलेल्या खर्चाशी

ताळमेळ घालावा. ताळमेळाचा अहवाल विहीत दिनांकांना जिल्हा परिषदांनी विभागीय आयुक्त (विकास शाखा) यांना व या विभागातील कार्यासन क्र. पा.पु. १० व पा.पु. २० ला सादर करावे. तसेच, झालेल्या खर्चाची माहिती दरमहा व त्रैमासिक अहवालात पुढील महिन्याच्या १० तारखेपर्यंत सादर करावा. त्याचप्रमाणे उपयोगिता प्रमाणपत्र महालेखापाल कार्यालयास सादर करावी व त्याची एक प्रत पा.पु. १० कार्यासनास पाठवावी. तसेच खर्चाची नोंद ऑनलाईन भरण्याची दक्षता घ्यावी.

यावर होणारा खर्च मागणी क्र. Y-०२ लेखाशिर्ष २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, १०२ ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम, ०२ जिल्हा परिषदांना योजनांतर्गत अनुदाने, अनुसूचित जाती उपयोजना (०२)(१३) नळाद्वारे पाणीपुरवठा योजना (स्थानिक स्तर), ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) (२२१५ १३२४) या लेखाशिर्षाखाली खर्ची घालावा व तो सन २०१४-१५ ह्या वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधिन शासन परिपत्रकाच्या अनुषंगाने या विभागास अर्थसंकल्पित तरतूद वितरीत करण्यास दिलेल्या अधिकारांतर्गत निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३२६११२६३३३८२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Gokhale Vidyadhar Y

Digitally signed by Gokhale Vidyadhar Y
DN: CN = Gokhale Vidyadhar Y, C = IN, S = Maharashtra, O = Govt of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation Department
Date: 2015.03.26 16:10:34 +05'30'

**(वि.य.गोखले)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र १ मुंबई (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता)
२. महालेखापाल, महाराष्ट्र २ नागपूर (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता)
३. संबंधित विभागीय आयुक्त.
४. संबंधित जिल्हा परिषद मुख्य कार्यकारी अधिकारी:
५. संबंधित जिल्हा परिषद मुख्य लेखा व वित्त अधिकारी
६. संचालक , पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, नवी मुंबई, बेलापूर
७. अधीक्षक अभियंता, विभागीय भारत निर्माण कक्ष सर्व विभाग.
८. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, संबंधित जिल्हा परिषद .

९. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
१०. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई
११. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा,
१२. वित्त विभाग (व्यय ३) मंत्रालय, मुंबई ३२
१३. नियोजन विभाग/१४४३, मंत्रालय, मुंबई ३२
१४. उपसचिव, अनुसूचित जाती उपयोजना, सामाजिक न्याय विभाग (विघयो), मंत्रालय, मुंबई ३२
१५. संचालक, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
१६. संबंधित जिल्हा समाज कल्याण अधिकारी.
१७. पाणी पुरवठा व स्वच्छ विभागातील कार्यासने क्र. पा.पु.०४, पा.पु.२०.
१८.अवर सचिव (पा.पु.१०), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई १
१९.निवडनस्ती पा.पु. १०

विवरणपत्र

**शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र. ग्रापापु-२०१४/प्र.क्र.३३/२०१४/पापु१०,**
**दि. २६ मार्च २०१५ चे सहपत्र**
**अनुसूचित जाती उपयोजनेंतर्गत नळ पाणी पुरवठा कार्यक्रमासाठी अनुदान.**
**लेखाशीर्ष (२२१५ १३२४)**

(रूपये लाखात)

| अ.क्र | जिल्हा परिषद | एकूण तरतूद | सन २०१४-१५ या अर्थिक वर्षात वितरीत करण्यात येत असलेला निधी | | |
|---|---|---|---|---|---|
| | | | योजना(जि.प.) | देखभाल व दुरूस्ती | एकूण (४+५) |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | वर्धा | ५२.०० | ४४.२ | ७.८ | ५२.०० |
| **एकूण** | | **रु. ५२.०० (रुपये बाबन्न लक्ष फक्त )** | | | |

Gokhale Vidyadhar Y

Digitally signed by Gokhale Vidyadhar Y
DN: CN = Gokhale Vidyadhar Y, C = IN, S = Maharashtra, O = Govt of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation Department
Date: 2015.03.26 16:11:43 +05'30'

**(वि.य.गोखले)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन